**विभागीय वन अधिकारी,गट-अ (वरिष्ठ श्रेणी)**
**या संवर्गात पदोन्नतीने पदस्थापना...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. एमएफएस-२०१६/प्र.क्र.१४४(१)/फ-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ ऑगस्ट, २०१७

वाचा :- १) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.एमएफएस-२०१६/प्र.क्र.१४४(१)/फ-८, दि.११/०८/२०१७.
२) शासन आदेश, महसूल व वन विभाग, क्र.आयएफएस-२०१७/प्र.क्र.८२/फ-७, दि.१६/०८/२०१७

**शासन आदेश :-**

शासन आदेश, महसूल व वन विभाग वाचा क्र.१, दि.११/०८/२०१७ अन्वये वन विभागातील सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी रु.९३००-३४८०० ग्रेड पे- रू.५०००) या संवर्गातील १० अधिकाऱ्यांची विभागीय वन अधिकारी, गट-अ (वरिष्ठ श्रेणी) (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे- रू.६६००) या संवर्गात तदर्थ स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती करण्यात आली आहे. यामध्ये श्री.अनंत लक्ष्मण जोशी यांचे पदोन्नतीचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने श्री.अनंत लक्ष्मण जोशी, विभागीय वन अधिकारी यांची पदस्थापना खालीलप्रमाणे करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | पदोन्नतीने नियुक्तीचे पद | अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | श्री.अनंत लक्ष्मण जोशी, विभागीय वन अधिकारी | संचालक, जालना वन प्रशिक्षण संस्था, जालना | श्री.व्ही. एम. गोडबोले यांच्या पदोन्नतीने रिक्त झालेल्या पदी. |

२. श्री.अनंत लक्ष्मण जोशी यांच्या पदस्थापनेने रिक्त झालेल्या पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. श्री.अनंत लक्ष्मण जोशी यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदोन्नतीचे / नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहित मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना सदर पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे गृहित धरुन शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.३०/०४/१९९१ व दि.१२/०९/२०१६ मधील नमूद तरतुदीनुसार शासनस्तरावरुन त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच त्यांनी पदोन्नती नाकारल्यास

त्यांना आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत विभागीय वन अधिकारी पदाचा १२/२४ वर्षाचा लाभ दिला असल्यास तो तात्काळ थांबविण्यात येईल व त्यांना विभागीय वन अधिकारी संवर्गात प्रत्यक्ष पदोन्नतीनंतर सदरचा लाभ देण्यात येईल, याची कृपया नोंद घ्यावी.

४. श्री.अनंत लक्ष्मण जोशी यांनी विभागीय वन अधिकारी या पदाचा कार्यभार ग्रहण केल्यावर वेतन निश्चितीचा विकल्प तात्काळ द्यावा. असा विकल्प न दिल्यास, त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियमावली १९८१ मधील नियम क्र.११ (१) (ए) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. सदर नियुक्ती / पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यास नियंत्रक अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित अधिकाऱ्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनास anil.dhas@nic.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरीत कळवावे.

६. सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०८१६१७५२१७२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.08.16 17:42:55 +05'30'

**( अतुल कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण, म.रा., पुणे.
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक /सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव)
८) सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण

९) सर्व उपवनसंरक्षक
१०) व्यवस्थापकीय संचालक, सिडको, सिडको भवन, सी.बी.डी बेलापूर,नवी मुंबई.
११) सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्या.-१२), मंत्रालय, मुंबई-३२
१२) महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१५) सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक
१६) संबंधित अधिकारी / प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा.नागपूर यांचे मार्फत.
१७) निवड नस्ती (फ-८ कार्यासन)महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.